प्रादेशिक मनोरुग्णालयाच्या अभ्यागत समित्यांचे पुनर्गठन करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रामरु २०१६ / प्रक्र-४५२/ आरोग्य ३(अ)

गो.ते.रुगणालय संकुल इमारत, १० वा मजला,
मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई- ४०० ००१
दिनांक: १६ मे,२०१७.

वाचा :-

१) मानसिक आरोग्य अधिनियम-१९८७ चे कलम ३, ५ व ६
२) शासन अधिसूचना क्रमांक सार्वजनिक आरोग्य विभाग,क्र.एमआयएस-१०८८/प्रक्र.१७७/ आ-३, दिनांक- ११ सप्टेंबर,१९९५.
३) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.अभ्यास-२००२/प्रक्र.२४६/आ-३, दिनांक- २७ जून, २००२.
४) शासन निर्णय क्रमांक: सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.माआका-२००७/प्रक्र.२९९/आ-३, दिनांक- २१ जुलै, २००७.
५) शासन निर्णय क्रमांक: सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.साआप्रा-२०११/प्रक्र.९९/आ-३अ, दिनांक- २५मार्च,२०११.
६) शासन निर्णय क्रमांक: सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.संकिर्ण-२०१४/प्रक्र.११६/आ-३अ, दिनांक- ५ ऑगस्ट, २०१५.
७) शासन निर्णय क्रमांक: सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.माआका-२०१५/प्रक्र.२६६/आ-३अ, दिनांक- २८ ऑगस्ट, २०१५.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत मानसिक आरोग्य विषयक धोरण प्रभावीपणे राबविण्यासाठी मानसिक आरोग्य कायदा १९८७ च्या कलम-३, ५ व ६ या कलमाखाली उपरोक्त शासन निर्णयान्वये मानसिक आरोग्य प्राधिकरण समितीची स्थापना करण्यात आली होती. आता दिनांक ५ ऑगस्ट, २०१५ व दिनांक २८ ऑगस्ट, २०१५ चे आदेश अधिक्रमित करुन सदर समितीची पुर्नरचना करण्यात येत आहे.

**खाजगी नोंदणीकृत मानसिक शुश्रृषागृहांचे तपासणी करण्यात आलेले प्रस्ताव अभ्यागत समिती मध्ये सादर करावे व अभ्यागत समितीने सदर प्रस्तावाची तपासणी करुन राज्य स्तरावरुन नोंदणी प्रमाण पत्र व नुतनीकरण प्रमाणपत्र देणे करीता शिफारस करावी .खाजगी मानसिक शुश्रृषागृहांना**

**अंतीम नोंदणी प्रमाण पत्र नुतनीकरण प्रमाणपत्र राज्यस्तरावरुन देण्यात येईल .समिती सदस्य खालील प्रमाणे असावेत: -**

अ) १) संबंधित प्रादेशिक मनोरुग्णालयाचे वैदयकिय अधिक्षक.
   २) खाजगी मानसिक शुश्रृषागृह असलेल्या जिल्हयाचे जिल्हा शल्यचिकित्सक.
   ३) प्रादेशिक मनोरुग्णालयाचे मनोविकारतज्ञ अथवा खाजगी मानसिक शुश्रृषागृह असलेल्या जिल्हयाचे मनोविकारतज्ञ.

ब) समितीचे अध्यक्ष हे संबंधित जिल्हयाचे जिल्हा व सत्र न्यायाधीश यांना करावे. तसेच सह अध्यक्ष हे अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य) यांना करावे.

क) प्रादेशिक मनोरुग्णालयातील भरती होणा-या आंतररुग्णांच्या मृत्यूंचे अभ्यागत समितीच्या बैठकीच्या दिवशी सखोल आढावा घ्यावा व त्याचा अहवाल तयार करावा.

**तरी वरीलप्रमाणे बदल केल्यास अभ्यागत समितीच्या कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहतील :-**

१) मानसिक आरोग्य कायदा १९८७ मधील अनुच्छेद ५ मधील भाग क्र .१ मधिल कलम ३७ ,३८ व ३९ प्रमाणे सदर समिती कामकाज पाहील.
२) कार्यक्षेत्रातील खाजगी नोंदणीकृत मानसिक शुश्रृषागृहांचा परवाना व नुतनीकरणाकरिता गठीत केलेल्या समितीचा अहवाल तपासून त्याप्रमाणे राज्यस्तरावर शिफारस करणे.
३) दर महिन्याला अभ्यागत समिती सदस्यांच्या बैठकीत मनोरुग्णालयातील बरे झालेल्या रुग्णांना डिसचार्ज व प्रमाणपत्र देणे.
४) प्रादेशिक मनोरुग्णालयात भरती असणा-या आंतररुग्णांच्या मृत्यूचे अभ्यागत समितीच्या बैठकीच्या दिवशी परिक्षण करुन सखोल आढावा घेणे (Death Audit) व त्याचा अहवाल सादर करणे.
५) मनोरुग्णालयाच्या तपासणीकरिता नियमित भेट देणे .

**<u>पुनर्गठीत समिती</u>**

**प्रादेशिक मनोरुग्णालय ,ठाणे**

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हा व सत्र न्यायाधीश ,ठाणे | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त संचालक, (मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा, मुंबई | सह अध्यक्ष |
| ३ | उपसंचालक ,आरोग्य सेवा ,मुंबई मंडळ ,ठाणे | सदस्य |
| ४ | विभागीय समाजकल्याण अधिकारी ,ठाणे | सदस्य |
| ५ | जिल्हा शल्य चिकित्सक ,सामान्य रुग्णालय ,ठाणे | सदस्य |
| ६ | कार्यकारी अभियंता ,सार्वजनिक बांधकाम विभाग ,ठाणे | सदस्य |
| ७ | अधिक्षक ,मध्यवर्ती कारागृह ,ठाणे | सदस्य |
| ८ | वैद्यकीय अधिक्षक ,प्रादेशिक मनोरुग्णालय ,ठाणे | सदस्य सचिव |

## प्रादेशिक मनोरुग्णालय ,पुणे

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हा व सत्र न्यायाधीश ,पुणे | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त संचालक, (मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा, मुंबई | सह अध्यक्ष |
| ३ | उपसंचालक ,आरोग्य सेवा ,पुणे मंडळ ,पुणे | सदस्य |
| ४ | विभागीय समाजकल्याण अधिकारी ,पुणे | सदस्य |
| ५ | जिल्हा शल्य चिकित्सक ,सामान्य रुग्णालय,पुणे | सदस्य |
| ६ | कार्यकारी अभियंता ,सार्वजनिक बांधकाम विभाग ,पुणे | सदस्य |
| ७ | अधिक्षक ,मध्यवर्ती कारागृह ,पुणे | सदस्य |
| ८ | वैद्यकीय अधिक्षक ,प्रादेशिक मनोरुग्णालय ,पुणे | सदस्य सचिव |

## प्रादेशिक मनोरुग्णालय,नागपूर

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हा व सत्र न्यायाधीश ,नागपूर | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त संचालक, (मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा, मुंबई | सह अध्यक्ष |
| ३ | उपसंचालक ,आरोग्य सेवा ,नागपूर मंडळ ,नागपूर | सदस्य |
| ४ | विभागीय समाजकल्याण अधिकारी,नागपूर | सदस्य |
| ५ | जिल्हा शल्य चिकित्सक ,सामान्य रुग्णालय,नागपूर | सदस्य |
| ६ | कार्यकारी अभियंता ,सार्वजनिक बांधकाम विभाग,नागपूर | सदस्य |
| ७ | अधिक्षक ,मध्यवर्ती कारागृह,नागपूर | सदस्य |
| ८ | वैद्यकीय अधिक्षक ,प्रादेशिक मनोरुग्णालय ,नागपूर | सदस्य सचिव |

## प्रादेशिक मनोरुग्णालय,रत्नागिरी

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हा व सत्र न्यायाधीश ,रत्नागिरी | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त संचालक, (मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा, मुंबई | सह अध्यक्ष |
| ३ | उपसंचालक ,आरोग्य सेवा,कोल्हापूर मंडळ,कोल्हापूर | सदस्य |
| ४ | विभागीय समाजकल्याण अधिकारी, रत्नागिरी | सदस्य |
| ५ | जिल्हा शल्य चिकित्सक ,सामान्य रुग्णालय, रत्नागिरी | सदस्य |
| ६ | कार्यकारी अभियंता ,सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी | सदस्य |
| ७ | अधिक्षक ,मध्यवर्ती कारागृह, रत्नागिरी | सदस्य |
| ८ | वैद्यकीय अधिक्षक ,प्रादेशिक मनोरुग्णालय ,रत्नागिरी | सदस्य सचिव |

समितीतील अशासकीय सदस्यांना बैठकीस हजर राहण्यासाठी वर्ग-१ च्या अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवासभत्ता व दैनिक भत्ता आणि रुपये ३०० बैठक भत्ता देय आहे. सदर भत्ता त्या-त्या रुग्णालयाच्या अनुदानातून देण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०५१६१४०१५८००१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vithoba Kadam

Digitally signed by Arun Vithoba Kadam
DN: cn=Arun Vithoba Kadam, o=Mantralay, ou=PHD, email=arun.kadam@nic.in, c=US
Date: 2017.05.16 17:17:16 +05'30'

**(अ.वि.कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य सेवा मार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम), मुंबई.
४. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (मानसिक आरोग्य) , मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे/ पुणे/ कोल्हापूर/ नागपूर
६. वैद्यकीय अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे/ पुणे/ रत्नागिरी/ नागपूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/ पुणे/ रत्नागिरी/ नागपूर.
९. सर्व संबंधित सदस्य ( संचालनालयामार्फत )
१०.निवडनस्ती आरोग्य-३ अ